सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण व तत्सम, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांना उपायुक्त, समाज कल्याण व तत्सम, गट-अ संवर्गात तदर्थ पदोन्नती देणेबाबत...

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन आदेश क्र.सकआ २०२३/प्र.क्र.२५३/आस्था-२,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १६ जून, २०२५

वाचा-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-एसआरव्ही-२०१८/प्र.क्र. १५९/कार्यासन-१२, दि. ०१.०८.२०१९

२) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र.सकआ/आस्था-१/उप आयुक्त/वर्ग-१/ पदोन्नती / २०२३ -२४/का-६/५७२, दि. १२.०२.२०२४

३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन आदेश, क्र. २०२३/प्र.क्र. २४५/आस्था-२, दि. ०६.०९.२०२४

शासन आदेश-

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण व तत्सम गट-अ ( वेतन मॅट्रीक्स मधील वेतन स्तर एस-२०:५६१००-१७७५००) या संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना उपायुक्त, समाज कल्याण व तत्सम गट-अ (वेतन मॅट्रीक्स मधील वेतन स्तर एस-२३: ६७७००-१९०८००) या संवर्गात खालील अटींच्या अधिन राहुन, तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र .४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | मूळ प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापने ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १ | श्रीमती हिरा गाढे, सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे | इ.मा.व. | उपायुक्त, दिव्यांग कल्याण, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून पदोन्नती देण्यात येत आहे -

१. निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

२. मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि. २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि/१६-ब कार्यासनाच्या

दि. ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दि. ७.५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सहमती देण्यात येत आहे.

३. दिव्यांग कर्मचाऱ्यांना पदोन्नतीमध्ये आरक्षण देण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, १६-ब यांनी दि. २०.०४.२०२३ अन्वये दिलेल्या सुचनानुसार निवडसूचीस मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५. निवडसूचीतील ज्या अधिकाऱ्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु असेल त्यांच्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. १५.१२.२०१७ व दि. ३०.०८.२०१८ नुसार कार्यवाही करावी.

६. निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ०१.०८.२०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधिन राहून सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

७. सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. १२.०९.२०१६ नुसार कार्यवाही करावी.

८. सदरहू पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांना सेवाज्येष्ठतेचा कोणताही लाभ मिळणार नाही.

९. तदर्थ पदोन्नती दिलेल्या पदावर सरळसेवेने उमेदवार उपलब्ध झाल्यास अथवा प्रतिनियुक्तीवर बाहेर गेलेले अधिकारी/कर्मचारी रुजू झाल्यास तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची तदर्थ पदोन्नती संपुष्टात आणण्यात येईल.

३. निवडसूचीतील अधिकाऱ्यांला पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात येत आहे. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना पदोन्नतीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन त्याबाबतचा रुजू अहवाल आयुक्त, समाज कल्याण पुणे व शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०६१६१६०४२३०१२२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMIT VITHAL DHUMAK

Digitally signed by SAMIT VITHAL DHUMAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a6cbff7b4d3ed15df788674ffecd4ae00264aa1850045a1ac17569192ba78bed, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B1CD18FE60131EF608B0E4073778971ADE587A7FD66763006762AEA44424999B, cn=SAMIT VITHAL DHUMAK
Date: 2025.06.16 16:32:25 +05'30'

**( समित धुमक )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

श्रीमती हिरा गाढे, सहायक संचालक,इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
(आयुक्त, समाज कल्याण,पुणे यांचे मार्फत)

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
३. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
५. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
६. सर्व प्रादेशिक उपायुक्त/ उपायुक्त, समाज कल्याण
७. सर्व उपायुक्त तथा सदस्य जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण
११. सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१२. सह सचिव/सर्व उप सचिव/अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
१३. मा.मंत्री (सा. न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. मा. राज्यमंत्री (सा. न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५. प्रधान सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
१६. आस्था -२ निवडनस्ती